महाराष्ट्र ग्रामदान मंडळास २०१४-२०१५
सहायक अनुदान देणे.

## महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
### शासन निर्णय क्रमांकः ग्रामदान-१२/२०१३/प्र.क्र.५१४/ज-१

जागतिक व्यापार केंद्र, सेंटर १ इमारत, ३२ वा मजला
मुंबई-४०० ००५
दिनांक: ११ सप्टेंबर, २०१४

**संदर्भ :-** १. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.जीडीएन १०७४/१६०७/ग-२, दि.१६.५.१९७६.
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय व अधिसूचना क्र.भूदान ०७/२००८/प्र.क्र.१०६/ज-१, दि.५.९.२००८.
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१४/२२२५/प्र.क्र.७७/ब-१, दि. ०१.०४.२०१४.
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१४/२२२५/प्र.क्र.७७/ब-१, दि. १४.०७.२०१४.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र ग्रामदान मंडळाची पुर्नस्थापना मा.श्री.आबा पांडुरंग कांबळे यांच्या अध्यक्षतेखाली शासन राजपत्रातील अधिसूचना क्र. जीडीएन ०८/२०१२/प्र.क्र.२९/ज-१, दि.१७.११.२०१२ अन्वये करण्यात आलेली आहे. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. जीडीएन- १०७४/१६०७/ग-२, दि.१६.५.१९७६ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला अनुदान देण्याबाबत अटी व शर्ती विहित करण्यात आल्या आहेत.

२. महाराष्ट्र ग्रामदान मंडळास कार्यकर्त्यांचे मानधन, कार्यालयीन खर्च, कार्यकर्ता प्रशिक्षण व इतर किरकोळ खर्च इत्यादीवरील खर्च भागविण्याकरिता सन २०१४-१५ च्या अर्थसंकल्पात रु.५,००,०००/- (रुपये पाच लाख फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. संदर्भ क्र.४ येथे नमूद शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पीत निधीपैकी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६६ टक्केच्या मर्यादेत म्हणजेच रु.३.३० लक्ष वितरित करण्यास मंजूरी दिली आहे. त्यानुसार अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे अर्थसंकल्पीत निधीपैकी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६६ टक्केच्या मर्यादेत म्हणजेच रु.३.३० लक्ष इतक्या रकमेचे निधी उपलब्धता प्रमाणपत्र या शासन निर्णयाद्वारे देण्यात येत आहे. सदर अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे या विभागास उपलब्ध करुन दिले आहे. त्यानुसार या शासन

निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली उक्त तरतूद रु.३.३० लक्ष "आहरण व संवितरण अधिकारी, रोख शाखा " महसल व वन विभाग यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

३. अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ यांनी सन २०१४-१५ करीता मंजूर वितरीत अनुदानातून केलेल्या खर्चाचा ताळमेळ घालून आणि लेखापरीक्षण करुन, लेखापरीक्षण अहवाल शासनास सादर करावा.

४. **सन २०१४-१५** या आर्थिक वर्षात, महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला या आदेशाद्वारे मंजूर करण्यात आलेली, अर्थसंकल्पीत निधीपैकी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६६ टक्केच्या मर्यादेत म्हणजेच रु.३.३० लक्ष इतकी रक्कम " सी-५-२२२५-अनुसूचित जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण -८०- सर्वसाधारण -८०००-इतर खर्च- (००) (०२)- महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला सहाय्यक अनुदान-(२२२५००६५), (दत्तमत) ३१-सहायक अनुदान (योजनेत्तर)" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकण्यात यावी.

५. महाराष्ट्र विनियोजन विधेयक-२०१४, परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थसंकल्प-३ दि.१/७/२०१४ सोबतच्या परिशिष्ठातील मुद्दा.क्र.-४ मध्ये नमूद केल्यानुसार योजनेच्या स्वरूपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने वित्त विभागाची सहमती आवश्यक नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१११२३६४२२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Shridharrao Kothekar

Digitally signed by Sunil Shridharrao Kothekar
DN: CN = Sunil Shridharrao Kothekar, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.09.11 16:58:29 +05'30'

**( सुनिल कोठेकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल (लेखापरीक्षा) (लेखा व अनुज्ञयेता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२) अधिदान लेखा अधिकारी, मुंबई
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव./वि.का.अ., मंत्रालय, मुंबई-३२,

५) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, वर्ल्ड ट्रेड सेंटर, ३२ वा मजला, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मुं.-०५
७) सह सचिव (रोख शाखा) महसूल व वन विभाग, मुंबई.०५
८) उप सचिव, (ब-१) महसूल व वन विभाग, मुंबई.०५
९) उपसचिव,(ज-१) महसूल व वन विभाग, मुं.०५
१०) श्री. आबा पांडुरंग कांबळे, अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ, महाराष्ट्र प्रदेश सर्वोदय मंडळ, महात्मा गांधी सेवा मंदिर, स्वामी विवेकानंद रस्ता, बांद्रा (पश्चिम), मुंबई-५०.
११) कार्यासन अधिकारी, रोखशाखा, महसूल व वन विभाग, मुं.०५
१२) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मुं.०५
१३) वित्त विभाग, अर्थसंकल्प -४ / व्यय-९, मंत्रालय, मुंबई
१४) कार्यासन अधिकारी, ल-१ सेल, महसूल व वन विभाग, मुं.०५
१५) सचिव, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ, महाराष्ट्र प्रदेश सर्वोदय मंडळ, महात्मा गांधी सेवा मंदिर, स्वामी विवेकानंद रस्ता, बांद्रा (पश्चिम), मुंबई-४०० ०५०
१६) निवडनस्ती (ज-१)